**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१८/प्र.क्र. ७४/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१८

<u>वाचा</u> :-

१) शासन परिपत्रक वित्त विभाग,क्र. अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक साववि-२०१८/प्र.क्र. ७४ /फ-११, दि. १९ मे, २०१८
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक साववि-२०१८/प्र.क्र. ७४ /फ-११, दि. २९ मे, २०१८
४) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१६/३९८/१८-१९, दि. ०८.०६.२०१८
५) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा. नागपूर , यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१६/३८९/१८-१९, दि. ०७.०६.२०१८

<u>प्रस्तावना</u> :-

वन व वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) "** या योजनेंतर्गत रु.६७०००.०० लक्ष इतका निधी (**०२- मजूरी** रु. ५७०६९.२० लक्ष + **२१ पुरवठा व सामुग्री**- रु.९९३०.८० लक्ष) अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. त्यापैकी वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु.३०१३५.०० लक्ष इतकी तरतूद आहे. यापैकी माहे एप्रिल-२०१८ ते डिसेंबर २०१८ पर्यंतच्या ९ महिन्यांच्या कालावधीकरीता वित्त विभागाच्या संदर्भिय दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकास अनुसरुन अर्थसंकल्पित रकमेच्या ७० % म्हणजेच रु. २१०९४.५० लक्ष इतका निधी वितरित करता येऊ शकेल.

३. शासन निर्णय, दिनांक १९.०५.२०१८ अन्वये रु. ४३९७.०० लक्ष व शासन निर्णय दिनांक २९.०५.२०१८ अन्वये रु. ३२८५.७२ लक्ष असा एकूण रु. ७६८२.७० लक्ष इतका निधी "(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२) " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करीता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत बांधिल कामाकरिता वितरित करण्यात आला आहे.

४. आता अप्पर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांच्या संदर्भ क्र. ४ आणि ५ येथील पत्रान्वये खाली नमूद केल्याप्रमाणे अनुक्रमे रु. १११६.६१ लक्ष व रु. ४१४७.२८ लक्ष असे मिळून एकूण रु.५२६३.८९ लक्ष इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

| अ.क्र | वनवृत्त | वनविभाग | बांधिल कामे (क्षेत्र)( हेक्टर) ( वर्ष ) | | | | एकूण कामे हेक्टर | निधी रु. लाखात |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | प्रथम | द्वितीय | तृतीय | चतुर्थ | | |
| १. | कोल्हापूर | कोल्हापूर | २६५ | १०० | ५९.५० | ० | ४२४.५० | २१६.३२ |
| | | सातारा | ६२५ | १२० | १३५ | ० | ८८०.०० | ६३०.०९ |
| | | सांगली | २१५ | २०९.९५ | १३८ | ८० | ६४२.९५ | २१३.५५ |
| | | सावंतवाडी | २०५ | ० | ० | ० | २०५.०० | ५६.६५ |
| | **एकूण (१)** | | **१३१०** | **४२९.९५** | **३३२.५०** | **८०** | **२१५२.४५** | **१११६.६१** |
| २ | औरंगाबाद | उस्मानाबाद | १०५०.५० | ६४५ | ५४९ | २०८ | २४५२.५० | ९४०.३७ |
| | | परभणी | ४०० | १०० | १४८ | १०० | ७४८.०० | २९८.५६ |
| | | औरंगाबाद | ९२५ | ४०० | ४१५ | १०० | १८४०.०० | ७३२.९४ |
| | | बीड | ६४० | ५६० | ५९० | २४० | २०३०.०० | ६८५.४५ |
| | | नांदेड | १३४० | ८१५ | ६२० | १७५ | २९५०.०० | ८९९.७८ |
| | | हिंगोली | ६५७ | ५९६ | ४३५ | ५० | १७३८.०० | ५९०.१८ |
| | **एकूण(२)** | | **५०१२.५०** | **३११६** | **२७५७** | **८७३** | **११७५८.५०** | **४१४७.२८** |
| | **एकूण (१) व (२)** | | **६३२२.५०** | **३५४५.९५** | **३०८९.५०** | **९५३** | **१३९१०.९५** | **५२६३.८९** |

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात (००) (०६) **सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)** या योजनेंतर्गत वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे जून २०१८ ते डिसेंबर २०१८ अखेर या कालावधीकरिता कोल्हापूर व औरंगाबाद या वन वृत्तांकरिता रु. ५२६३.८९ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. विवरणपत्र-१ प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. तसेच निधी खर्च करताना वर्षनिहाय जिवंत रोपांची संख्या विचारात घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.तसेच याबाबतीत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदींची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

५. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन,**
**वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६ ०४९२).**

६ सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या संदर्भिय दि. २ एप्रिल २०१८ च्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०६२११३२३३४१९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4a0f51184eb8e42644affc326f734133e2da973d24448c2cf323cb1cb2e347e, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2018.06.21 13:23:18 +05'30'

**( विजय खेडेकर )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) औरंगाबाद/ कोल्हापूर
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण, औरंगाबाद/ पुणे
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१०. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.

## विवरणपत्र -१

## शासन निर्णय क्र. साववि-२०१८/प्र.क्र.७४/फ-११, दिनांक २१.०६.२०१८

## योजनेचे नाव:- वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम मुख्यलेखाशिर्ष :- (४४०६ ०४९२)

(रु. लाखात)

| सविस्तर लेखाशीर्ष | २०१८-१९ करिता अर्थ संकल्पित रक्कम | वित्त विभागाच्या परिपत्रक दि.०२.०४.२०१८ अन्वये वितरणासाठी एकूण उपलब्ध निधी | आतापर्यंत वितरित निधी | वितरणा साठी शिल्लक निधी | जून २०१८ | जुलै २०१८ | ऑगस्ट २०१८ | सप्टेंबर २०१८ | ऑक्टो. २०१८ | नोव्हे. २०१८ | डिसेंबर २०१८ | एकुण वितरित तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| "मागणी क्र. सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च (००)(०६) वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम ( ४४०६ ०४९२)" | | | | | | | | | | | | |
| ०२- मजूरी | | | | | ६०१.५९ | ६०१.५९ | ६०१.५९ | ६०१.५९ | ६०१.५९ | ६०१.५९ | ६०१.५९ | ४२११.१३ |
| २१- पुरवठा व सामुग्री | | | | | १५०.३९ | १५०.३९ | १५०.३९ | १५०.३९ | १५०.३९ | १५०.३९ | १५०.४२ | १०५२.७६ |
| **एकूण** | ३०१३५.०० | २१०९४.५० | ७६८२.७० | १३४११.८० | ७५१.९८ | ७५१.९८ | ७५१.९८ | ७५१.९८ | ७५१.९८ | ७५१.९८ | ७५२.०१ | ५२६३.८९ |

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4a0f51184eb8e42644affc326f734133e2da973d24448c2cf323cb1cb2e347e, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2018.06.21 13:24:49 +05'30'

**( विजय खेडेकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन